कनिष्ठ पद/संवर्ग/सेवामधून वरिष्ठ पद/संवर्ग/ सेवामधील पदोन्नती करताना पाळावयाची तत्वे.

---

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-एसआरव्ही-१०७७/सीआर-३४३/७२/१२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १८ मे, १९८३

वाचा :- १] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७४/डी, दिनांक २८ जानेवारी, १९७५.

२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७५/३४२/१०, दिनांक १ एप्रिल, १९७६

३] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७७/३६५८/१२, दिनांक १९ सप्टेंबर, १९७७.

४] शासन परिपत्रक, ज्ञापन क्रमांक-एसआरव्ही-१०७८/३१२/१२, दिनांक ७ फेब्रुवारी, १९

शासन निर्णय:-

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०७४/डी, दिनांक २८ जानेवारी, १९७५ मधील आदेशाप्रमाणे, शासन सेवेतील वर्ग १ मधील प्रथम पदोन्नती वरील पदोन्नत्या निश्चित गुणवत्तेच्या निकषानी केल्या जातात आणि वर्ग १ मधील प्रथम पदोन्नती पर्यन्तच्या सर्व पदोन्नत्या "ज्येष्ठतेप्रमाणे योग्यता" पाहून [ siniority subject to fitness ]केल्या जातात. पदोन्नती करताना गुणवत्तेला अधिकाधिक वाव देण्याच्या दृष्टीने, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही-१०७५/३४२/१०, दिनांक १ एप्रिल, १९७६ अन्वये आदेशित करण्यात आले की वर्ग १ मधील प्रथम पदोन्नती पर्यन्तच्या सर्व पदोन्नत्या करताना त्यातील २५ टक्के जागा केवळ गुणवत्तेच्या आधारावर ज्येष्ठतेचा विचार न करता भरण्यासाठी राखून ठेवाव्यात. या आदेशानुसार वर्ग १ मधील प्रथम पदोन्नतीसाठीच्या पदावर पदोन्नती देण्यासाठी निवडसूची तयार करताना ७५ टक्के जागा नेहमीच्या "ज्येष्ठता व योग्यता" या निकषाद्वारे आणि उरलेल्या २५ टक्के जागा "निश्चित गुणवत्तेच्या" निकषाद्वारे भरावयाच्या असतात.

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, या आदेशाची अंमलबजावणी करताना काही व्यावहारिक अडचणी उत्पन्न होतात. म्हणून या आदेशांचे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सल्ल्याने पुनर्विलोकन करण्यात आले. या विषयाचा सखोल आणि सांगोपांग विचार करून शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

[कृ.मा.प.]

[अ] विशिष्ट गुणवत्ता धारकांसाठी २५ टक्के पदे राखीव ठेवण्यासंबंधीचे शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७५/३४२/१०, दिनांक १ एप्रिल, १९७६ व्दारा निर्गमित झालेले आदेश आता मागे घेण्यात येत आहेत.

[ब] सर्व पदोन्नतीमध्ये अत्युत्कृष्ट अहवाल असणा-यांचा अंतर्भाव निवड सूचीमध्ये करताना ४ जागांपर्यन्तचे वरचे स्थान देण्याच्या विद्यमान प्रथेऐवजी ६ जागांपर्यन्तचे वरचे स्थान देण्यात यावे.

[क] निवड समितीने निवड सूची तयार करताना पुरेशा व्यक्तींचा विचार करता या दृष्टीने जेव्हा निवड सूची २५ किंवा कमी नावांची करावयाची असेल तेव्हा निवड समितीच्या विचारार्थ असलेल्या अधिका-यांची संख्या तयार करावयाच्या निवड सूचीच्या तिप्पट संख्येइतकी असावी. जेव्हा निवड सूची २५ पेक्षा अधिक नावांची असेल तेव्हा समितीच्या विचारार्थ अधिका-यांची संख्या निवड सूचीच्या दुप्पट इतकी असावी.

[ड] २५ टक्के पदांवर गुणवत्तेच्या निकषावर ज्या अधिका-यांना पदोन्नत्या आधीच देण्यात आल्या आहेत त्यांचा फेरविचार करण्यात येऊ नये. केवळ ज्या निवड सूचीमध्ये ज्यांचा या निकषांच्या आधारावर अंतर्भाव झाला असेल, परंतु अद्याप ज्यांना अशा पदोन्नत्या देण्यात आल्या नाहीत त्यांची नावे निवडसूचीमधून वगळण्यात यावीत व तेवढ्यापुरता निवडसूचीचा भाग रद्द समजण्यात यावा.

. तसेच विद्यमान नियमानुसार निवड सूचीत चार स्थानांपर्यन्त वरचे स्थान देण्याऐवजी सहा स्थानांपर्यन्त वरचे स्थान देण्याचा विचार वर दर्शविल्याप्रमाणे यापुढे व्हावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
[व.अं.कोटेश्वर]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव/उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
* प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* निबंधक, मुंबई उच्च न्यायालय, अपील बाजू, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
वेगवेगळ्या मंत्रालयीन विभागांच्या अखत्यारीतील सर्व विभागीय व कार्यालयीन प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग.
* पत्राने.